__कापूस खरेदी हंगाम २०१६-१७__
**कापसाची रक्कम शेतक-यांना अदा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास दुराव्यापोटी ( बिनव्याजी )कर्ज मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक कापूस-२०१६/प्र.क्र.७१/१०-स**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २५ जानेवारी, २०१७.

__प्रस्तावना__ :-

केंद्रिय वस्त्रोद्योग मंत्रालयाच्या दि.१९.१०.२०१६ च्या आदेशान्वये महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाची भारतीय कपास निगम मर्या. यांचा सबएजंट म्हणून काही अटींवर राज्यात कापसाची किमान आधारभूत किंमत योजना राबविण्यासाठी नियुक्ती केली आहे. त्यामध्ये या प्रयोजनासाठी Line of credit, letter of comfort किंवा Advance दिला जाणार नसल्याचे कळविले आहे. म्हणून हंगाम २०१६-१७ मध्ये कापूस खरेदी केल्यानंतर कापसाची रक्कम शेतक-यांना अदा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाला दुराव्यापोटी (बिनव्याजी) कर्ज मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार हंगाम २०१६-१७ मधील कापूस खरेदी योजनेंतर्गत कापूस उत्पादक पणन महासंघाने शेतक-यांकडून खरेदी केलेल्या / करावयाच्या कापसाची हमी किंमत अदा करण्यासाठी अर्थसंकल्पित रुपये ५०.०० कोटी (रुपये पन्नास कोटी फक्त) एवढया रकमेतून रु.४०.०० कोटी (रुपये चाळीस कोटी फक्त) एवढी रक्कम महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास दुराव्यापोटी (बिन व्याजी) कर्ज स्वरुपात उपलब्ध करुन देण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाने भारतीय कपास निगम सोबत यासंदर्भात रितसर करार करावा.

३. सदर रक्कम ही फक्त किमान आधारभूत किंमत अंतर्गत, कापसाची खरेदी केल्यानंतर, खरेदी झालेल्या कापसाची रक्कम संबंधित शेतकऱ्यांना अदा करण्यासाठी खर्च करण्यात येईल, याबाबतची जबाबदारी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाची राहील.

४. या कारणासाठी होणारा खर्च सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, "मागणी क्रमांक व्ही-५, ६४२५, सहकारासाठी कर्जे, (००) (१०८)- इतर सहकारी संस्थांना कर्जे, (०१) पणन सहकारी संस्था (०१) (०३) कापूस प्रापण योजनेच्या कार्यान्वयनासाठी सीमांतिक रक्कम (६४२५००६४) (योजनेतर)- ५५ कर्जे व आगाऊ रकमा" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०१६-१७ मध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास दुराव्यापोटी सन २०१५-१६ साठी दिलेली रक्कम महासंघाने दि.३१ जानेवारी, २०१७ पूर्वी शासनास परत करावी.

६. सदर बिनव्याजी कर्जाची रक्कम अधिदान व लेखाधिकारी, मुंबई येथून काढण्यासाठी व ती महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ, मुंबई या संस्थेस अदा करण्यासाठी श्री.र.गं.बोड्डू, कक्ष अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी, तसेच श्री. का.गो.वळवी, उप सचिव, (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. सदर रकमेचा धनादेश खाली नमूद केलेल्या यंत्रणेच्या नांवे काढण्यात यावा.

"THE MAHARASHTRA STATE CO-OPERATIVE COTTON GROWERS MARKETING FEDERATION LTD. MUMBAI"

८. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या कडील अनौपचारिक संदर्भ क्र.३१५/१६ व्यय-२, दिनांक २३/११/२०१६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१२५१४४८००११०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajay K Pawar

Digitally signed by Ajay K Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Opration Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2fa427e9f588f6677123583b3a1fc1ffcd6f1bdf7b78ab36007e8fe1b9734a2e, cn=Ajay K Pawar
Date: 2017.01.25 14:47:07 +05'30'

**(अजय क. पवार)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत-**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा , मुंबई-प्रथम/ नागपूर-द्वितीय
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ, मुंबई.
३) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) वित्त विभाग, (व्यय-२ / अर्थोपाय / अर्थसंकल्प-१२ ), मंत्रालय, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
७) उप सचिव (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अवर सचिव (१-स), अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन अधिकारी (रोख शाखा, १६-स, ) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती (का-१०-स)